

## जय गजानन ४५

महर्षी गृत्समद प्रल्हादास कथा सांगतांना पुढे म्हणतात- हे दैत्यराज! त्या मदासुराच्या आसपास असुर सेनापतींची मंडळी जमली. त्या सगळ्यांनी मदासुरास प्रेरित करण्यास आरंभ केला- हे असुरनायक, देवी आदिशक्तीने आपणास अशी अलौकिक वरदाने प्राप्त केली आहेत ती काय घरात बसून राहण्यासाठी? ब्रह्मांड विजयाचे वरदान असतांना आपल्याच राजधानीत बंदिस्त होण्यात काय अर्थ आहे! आम्ही सगळे सोबत आहोतच की. आपण विश्वविजय करू. देवतांना परास्त करू. देवराज्याचा, धर्मराज्याचा विनाश करू. तेच तर आपले जीवनध्येय आहे. आपण त्रैलोक्य विजय करून 'सर्व दैत्यमयं जगत्।' ची घोषणा सार्थ ठरवू.

दैत्यनायक मदासुराला मानवणारा असाच सल्ला असल्याने त्याने होकार भरला. दैत्यगुरू महर्षी कवींना म्हणजेच शुक्राचार्यांना बोलावण्यात आले. वंदन करून आत्ममनीषा कथन केली गेली. असुराचार्यांच्या आशीर्वादानंतर, मार्गदर्शनानंतर त्रैलोक्य विजयाचा संकल्प सोडला गेला.

संख्यावैभव ही अडचण राक्षसीवृत्तीला कधीच नसते. विध्वंसाच्या वाहत्या गंगेत हात धुवून घेण्यास सगळेच तत्पर असतात. देवराज्याचा विनाश करायचा आहे म्हटले की सगळे लहानसहान दैत्यही एकमत होऊन एका जागी जमा होऊ लागले. अनेकविध दुष्टमती दैत्यांचा जमावडा विलासद नगरीत ठाण मांडून बसला. चतुरंग सेनेची सज्ज्ता झाली आणि एके दिवशी तो जनसागर विश्वविनाशकारी लाटांच्या रूपात समोर सरकू लागला.

यमराजालाही भीती वाटावी अशा मेरूमंदार पर्वताप्रमाणे आकार असणारे काजळाचे पहाड वाटावेत असे दैत्यनायक त्या सेनेच्या अग्रभागी चालत होते. नानाविध शस्त्रास्त्रे धारण करणारे, विविध प्रकारचे कवच, चिलखत घातलेले ते वीर आपापल्या चित्रविचित्र वाहनाने निघाले होते. मागे त्यांची भयावह सेना होती. कोणी हाती मोठमोठे पाषाण घेतले होते. कोणी वृक्षच उपटून घेतले होते. कोणी पर्वतच धारण केले होते. अशा भयानक आकाराच्या तथा स्वरूपाच्या सेनेने प्रथम पृथ्वीला आक्रान्त केले.

अर्थात त्या समोर कोणता मानवी राजा टिकाव धरणार! काहींनी पलायन केले. जे समोर आले ते यमनगरीत गेले. काहींनी जीव वाचविण्यासाठी महर्षी च्यवनांच्या आश्रमात

आश्रय घेतला. सगळ्या भूमीवर गोंधळ माजला होता. जनजीवन अस्तव्यस्त झाले होते. प्रलयकाळ अचानक आल्यासारखी जनतेची अवस्था झाली होती. सप्तद्वीपा वसुंधरा पाहता पाहता राक्षस साम्राज्याची भाग झाली. सर्वत्र पाताल ध्वज फडकू लागला. मदासुराचाच जयजयकार कानी येऊ लागला.

मग त्या राक्षसी सेनेने आपला मोर्चा स्वर्गाकडे वळविला. देवगंधर्वांची वने, उद्याने नष्टभ्रष्ट करून ती सेना देवराजधानीकडे वाटचाल करू लागली. देवतांनी स्वर्गाधिपतीला सर्व वार्ता सांगितली. देवराजांनी सभा बोलावली. मात्र देवगुरू बृहस्पतींनी सरळ सल्ला दिला. देवेंद्रा, लढण्यात काहीही अर्थ नाही. विजयाची कोणतीच शक्यता नाही. आदिशक्तीच्या वरदानाने त्याला अशा काही शक्ती प्राप्त झाल्या आहेत की त्याच्यासमोर उभे राहणे कोणासही शक्य नाही. त्यामुळे सरळ स्वर्गत्यागच शहाणपणाचा निर्णय असेल.

देवगुरुंचे वाक्य प्रमाण मानत देवतांनी स्वर्ग सोडला. मदासुर तेथे आला. अमरावती नगरीवर आपली सत्ता स्थापिली. काही काळ त्याने त्या स्वर्गसुखांचा अनुभव घेतला. गंधर्व गायन श्रवण केले. अप्सरा नृत्य अवलोकिले. त्यानंतर तेथे तारकासुर इ. विविध दैत्यांना वेगवेगळ्या देवतांच्या स्थानी नेमून मदासुराने आपली नजर ब्रह्मलोकाकडे, सत्यलोकाकडे वळविली.

वेदाध्ययनरत, शांत स्वभावी, निर्मितीकारक भगवान ब्रह्माजीसाठी युद्ध वगैरे बाब म्हणजे 'अव्यापारेषु व्यापारच' होता. ब्रह्माजी कैलासनाथाला शरण गेले. मदासुराने ब्रह्मलोकाचा आनंद उपभोगण्यास प्रारंभ केला. आनंदोत्सव आटोपल्यावर मग वैकुंठावर चाल करण्यात आली. वैकुंठही रिकामा सापडला. श्रीहरींच्या आसनावर बसून त्याने त्या वैकुंठीय आनंदाचा आस्वाद घेतला. कल्पवृक्षाच्या आधारे समस्त राक्षसांनी अनेकानेक विषयोपभोग पदरात पाडून घेतले.

मग ती सेना कैलासावर आक्रमण करून गेली. श्रीशिवशंकरांसह तेथे आलेल्या समस्त देवता आदिशक्तीच्या मणिद्वीप लोकात तिच्या चरणाशी आश्रय घेत्या झाल्या. दैत्यांनी कैलास जिंकला. तेथे अपरंपार सुख भोगले. तो स्वत:स धन्य समजू लागला.

सगळ्या देवता शक्तिलोकी जमल्या. तेथे आदिशक्तीने त्यांना अभय दिले. माझ्याजवळ रहा. तो दैत्य येथे येणार नाही. माझ्याच वरदानाने तो गर्वयुक्त झाला आहे. माझे वचन तो ऐकील. येथे आला तरी माझी उपासनाच करेल. अपमान करणार नाही, असे मला वाटते. आणि समजा, गर्वयुक्त होऊन माझ्या या स्थानी त्याने त्रास देण्याचा अविचार केलाच तर मी त्याचें हनन करीन. देवतांनो, आपण निश्चिंत रहा.

त्या त्रिपुरसुंदरीच्या आशीर्वादाने भयरहित झालेल्या देवता तेथे शांतपणे राहू लागल्या.

***